**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : एसआरव्ही २०१९/प्र. क्र.३६२/का.१२
सामान्य प्रशासन विभाग
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई
दिनांक : ९ जुलै, २०२०

**प्रति,**

१) सहसचिव/ उपसचिव (आस्थापना), सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई.
२) उपसचिव (कार्या-१४), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) उपसचिव (सीपीटीपी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

विषय : **सरळसेवेने नियुक्तीबाबतच्या मार्गदर्शक सूचना व वेळापत्रकाबाबतच्या प्रारुप शासन निर्णयाबाबत अभिप्राय कळविण्याबाबत ...**

महोदय,

सरळसेवेने उमेदवारांना नियुक्ती देण्याच्या अनुषंगाने, वेगवेगळया शासकीय यंत्रणांमार्फत करण्यात येणाऱ्या नियुक्ती प्रक्रियेच्या कालमर्यादेत एकसूत्रीपणा नसल्याने, नियुक्ती संदर्भातील शासन आदेशातील सूचनांचे एकत्रिकरण करुन सर्वसमावेशक मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब तसेच, सरळसेवेच्या नियुक्ती प्रक्रियेतील टप्प्यांचे नव्याने वेळापत्रक निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

या अनुषंगाने प्रस्तावित शासन निर्णयाचा प्रारुप मसुदा सोबत जोडला आहे. आपल्या अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयात सरळसेवेने प्रत्यक्ष नियुक्ती देण्याची प्रक्रिया राबविताना येणाऱ्या अडचणी विचारात घेऊन , सदर प्रारुप शासन निर्णयाच्या अनुषंगाने आपले स्वयंस्पष्ट अभिप्राय /सूचना उप सचिव (सेवा) यांच्याकडे खालील नमुन्यात थेट पत्राद्वारे वा ई मेल वर geeta.kulkarni@nic.in हे पत्र निर्गमित झाल्यापासून १ महिन्याच्या आत सादर कराव्यात अशी आपणास विनंती आहे. तदनंतर आलेल्या सूचनांचा विचार केला जाणार नाही याची कृपया नोंद घ्यावी.

| प्रारुप आदेशातील टप्पा क्र. व अनुक्रमांक | अभिप्राय/सूचना | अभिप्राय/सूचनेसंदर्भात समर्थन/कारणमिमांसा |
|---|---|---|
| | | |
| | | |

सोबत- शासन निर्णयाचे प्रारुप

सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०९१२२२४६४७०७ असा आहे.

आपली,

Geeta Rahul Kulkarni
Digitally signed by Geeta Rahul Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87e2e317e0d978442ac6b599d6a0abcf73fe717ee52994443a8509075101cc93, serialNumber=92d474843b842720200d1a10946d5fc9348b9450f867605a47d177207c9bd384, cn=Geeta Rahul Kulkarni
Date: 2020.07.09 13:52:47 +05'30'

( गीता रा. कुलकर्णी)
उप सचिव (सेवा)

शासन पत्र क्रमांक : एसआरव्ही २०१९/प्र क्र.३६२/का.१२ दिनांक ९ जुलै,२०२०

**सोबतच्या प्रारुप शासन निर्णयाबाबतचे सहपत्र**

**शासन सेवेत सरळसेवेने नियुक्तीबाबतच्या मार्गदर्शक सूचना तसेच नियुक्ती प्रक्रियेचे वेळापत्रक निश्चित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**प्रारुप शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही -२०१६ /प्र.क्र.२८१ /कार्या १२**

मादाम कामा मार्ग, राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई ४०००३२

तारीख: ---------

**वाचा -**

१) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र. सीडीआ१०९३/१०७७/प्र.क्र.२३/९३/अकरा दि.१२ ऑक्टोबर, १९९३

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : बीसीसी २०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब , दिनांक १२ डिसेंबर, २०११

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: चापअ -१०१२/प्र.क्र.६३ /१६-अ, दिनांक २६ ऑगस्ट, २०१४

४) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : स्थाप्रप-१४१४/प्र.क्र.७३/१४/१३-अ, दिनांक ११ सप्टेंबर, २०१४

५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : स्थाप्रप-१४१५/(प्र.क्र.१४/१५)/१३-अ, दिनांक १९ सप्टेंबर, २०१७

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: चारित्र्य -२२१७/प्र.क्र.४८३/२०१७/१६-अ, दिनांक २८ ऑगस्ट, २०१७ व दिनांक २२ नोव्हेंबर, २०१७

७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरव्ही-२०१८/व्ही.आय.पी.६७/ प्र.क्र.२०१७/ कार्या-१२ दिनांक २८ मे,२०१८ व दिनांक २६ सप्टेंबर,२०१८

**प्रस्तावना :-**

सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या उमेदवारांना नियुक्ती देताना कोणकोणत्या बाबींची तपासणी करावी व नियुक्ती आदेशामध्ये कोणकोणत्या बाबींचा अनिवार्यपणे उल्लेख करावा, याबाबतचे विषयनिहाय वेगवेगळया शासकीय यंत्रणेमार्फत वेळोवेळी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. यामुळे प्रामुख्याने पुढील अडचणी उद्भवत आहेत.

- नियुक्तीच्या अनुषंगाने वेगवेगळया शासकीय यंत्रणांमार्फत निर्गमित केलेल्या आदेशांमध्ये समन्वयाअभावी नियुक्त प्रक्रियेच्या कालमर्यादेत एकसूत्रीपणा नसल्याचे दिसून येत आहे.
- नियुक्तीच्या वेळी तपासावयाच्या बाबी व नियुक्ती आदेशात नमूद करावयाच्या बाबी यांच्या संकलनाच्या अभावी नियुक्ती देताना अनेक महत्वाच्या कागदपत्रांची योग्यरित्या तपासणी होत नाही, तसेच नियुक्ती आदेशात योग्य त्या अटी व शर्तींचा उल्लेख केला जात नाही. त्यामुळे भविष्यात सदर

बाबींमुळे सेवाविषयक आणि ज्येष्ठतेविषयक अडचणी निर्माण होतात आणि न्यायालयीन प्रकरणे देखील उद्भवतात.

तसेच, सरळसेवेने नियुक्ती देताना जे विविध टप्पे त्यामध्ये अंतर्भूत आहेत त्या प्रत्येक टप्प्याचे वेळापत्रक शासनाने निश्चित केलेले नसल्याने, नियुक्ती प्रक्रियेस विलंब होत असून, शासकीय कामकाजासाठी तात्काळ कर्मचारी उपलब्ध न झाल्याने शासकीय कामकाजावर त्याचा विपरीत परिणाम होत आहे.

यास्तव, शासनाचे नियुक्तीच्या संदर्भातील विविध यंत्रणांच्या आदेशातील सूचना विचारात घेऊन, प्रशासकीय यंत्रणेस या सर्वांचे एकत्रित संकलन सुलभ संदर्भासाठी प्राप्त व्हावे या उद्देशाने संदर्भाधीन सर्व आदेशातील सूचनांचे एकत्रिकरण करुन सर्वसमावेशक मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब तसेच, शासनाची रिक्त पदे तातडीने भरण्याच्या दृष्टीने सरळसेवेच्या नियुक्ती प्रक्रियेतील टप्प्याचे नव्याने वेळापत्रक निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**प्रारुप शासन निर्णय-**

सरळसेवेने नियुक्ती देण्याची कार्यवाही करत असताना,सर्व प्रशासकीय विभाग व नियुक्ती प्राधिकारी यांना, नियुक्तीच्या अनुषंगाने निर्गमित विविध शासन आदेशांचे एकत्रित संकलन सुलभ संदर्भासाठी प्राप्त व्हावे यासाठी सदर शासन निर्णयाद्वारे नियुक्तीबाबतच्या सर्वसमावेशक मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत. तसेच, सरळसेवेच्या नियुक्ती प्रक्रियेचे वेळापत्रक देखील निश्चित करण्यात येत आहे. `

अ) **मूळ गुणवत्ता यादीनुसार नियुक्तीबाबतची कार्यपध्दती व वेळापत्रकः-** प्रशासकीय विभाग प्रमुख /नियुक्ती प्राधिकारी यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोग अथवा निवड समिती यांचेकडे पाठविलेल्या मागणीपत्रातील पदसंख्येएवढया उमेदवारांची आयोगाकडून अथवा निवड समितीकडून एकाच शिफारसपत्राद्वारे संबंधितांच्या दूरध्वनीक्रमांक व ई मेलआयडी सह गुणवत्ता यादी ई-मेल द्वारे प्राप्त झाल्यानंतर खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

**टीप** -_महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने अथवा निवड समितीने संबंधित कार्यालयास मागणीपत्राच्या अनुषंगाने उमेदवारांचे शिफारसपत्र पाठविताना, त्यासोबतच संबंधित उमेदवारांचे दूरध्वनीक्रमांक व ई मेलआयडी उपलब्ध करुन द्यावेत. तसेच, सदर शिफारस पत्रातील उमेदवारांना शासकीय सेवेत तात्काळ रुजू करुन घेण्याच्या अनुषंगाने शिफारस पत्र हे ई-मेल द्वारेच पाठविण्यात यावे.

| अ.क्र. | नियुक्ती प्रक्रियेचे टप्पे | नियुक्तीच्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही | वेळापत्रक |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| **टप्पा क्र.१- तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश** | | | |
| १. | **ज्या प्रकरणामध्ये आयोग/निवड समिती यांचे शिफारसपत्र हे समन्वय करणाऱ्या कार्यालयाकडे प्राप्त होते, अशा प्रकरणात करावयाची कार्यवाही** | | |
| | तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश | समन्वय कार्यालयाने आयोगाकडून अथवा निवड समितीकडून ई-मेल द्वारे संबंधितांच्या दूरध्वनीक्रमांक व ई मेलआयडी सह शिफारसपत्र प्राप्त झाल्यानंतर संबंधित –उमेदवारांच्या तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश निर्गमित करावेत व सदर आदेशात उमेदवारांना कोणत्या कार्यालयामध्ये नेमणूक देण्यात येत आहे ही बाब स्पष्टपणे नमूद करुन संबंधित उमेदवारास नेमून | आयोगाकडून अथवा निवड समितीकडून ई-मेल द्वारे संबंधितांच्या दूरध्वनीक्रमांक व ई मेलआयडी |

| | | | |
|---|---|---|---|
| | | दिलेल्या कार्यालयात सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसात रुजू होण्याबाबत ई-मेलद्वारे व ई-संदेशाद्वारे कळवावे . संबंधित उमेदवारास ई-मेलद्वारे आदेश निर्गमित करताना त्याची एक प्रत उमेदवाराला नेमून दिलेल्या कार्यालयास देखील पृष्ठांकित करावी. तात्पुरत्या नेमणुकीच्या आदेशात नमूद करावयाच्या बाबी सोबतच्या **परिशिष्ट एक (अ)** प्रमाणे राहतील. | सह गुणवत्ता यादी प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ७ कार्यालयीन दिवसात |
| २. | **ज्या प्रकरणामध्ये शिफारसपत्र नियुक्त प्राधिकाऱ्यांकडे थेट प्राप्त होते अशा प्रकरणात करावयाची कार्यवाही** | | |
| | संबंधित उमेदवाराच्या तात्पुरत्या **नेमणूकीचे आदेश** निर्गमित करणे | आयोग/ निवडसमितीकडून शिफारसपत्र प्राप्त झाल्यानंतर उमेदवारास ई मेलद्वारे व ई-संदेशा द्वारे तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश निर्गमित करुन, सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसात कार्यालयात रुजू होण्याबाबत सूचित करावे. तात्पुरत्या नेमणुकीच्या आदेशात नमूद करावयाच्या बाबी सोबतच्या **परिशिष्ट एक (ब)** प्रमाणे राहतील. | आयोगाकडून अथवा निवड समितीकडून ई-मेल द्वारे संबंधितांच्या दूरध्वनीक्रमांक व ई मेलआयडी सह गुणवत्ता यादी प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ७ कार्यालयीन दिवसात |
| ३. | **ज्या संवेदनशील पदांच्या अनुषंगाने नेमणूक आदेश देण्यापूर्वी चारित्र्य पडताळणी अहवाल आवश्यक आहे अशा प्रकरणात करावयाची कार्यवाही** | | |
| | ३.१) पोलीस यंत्रणेकडून चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल मागवूनघेण्यासाठी पत्र पाठविणे | संदर्भाधीन क्र.७ येथील दिनांक २८ ऑगस्ट २०१७ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार ज्या प्रकरणी नियुक्ती प्राधिकारी यांचे मत असेल की, उमेदवाराची नियुक्ती संवेदनशील पदावर करावयाची आहे किंवा ज्या प्रकरणी सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून नियुक्ती पूर्व सखोल पडताळणीची आवश्यकता आहे. अशा प्रकरणी चारित्र्य पडताळणी केल्यानंतरच नियुक्ती देणे आवश्यक असल्याने गुणवत्ता यादी/निवडयादी प्राप्त झाल्यानंतर तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश निर्गमित न करता प्रथम पोलीस यंत्रणेस १ महिन्यात संबंधित उमेदवारांचा चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल देण्याबाबत विनंती करणारे पत्र निर्गमित करावे. | शिफारसपत्र प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ७ कार्यालयीन दिवसात |
| | ३.२) पोलीस यंत्रणेकडून चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त करुन घेणे | संबंधित पोलीस यंत्रणेस पत्र निर्गमित केल्यानंतर १ महिन्यात संबंधित यंत्रणेकडे पाठपुरावा करुन अहवाल प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयाची राहील. | पत्र निर्गमित केल्यापासून १ महिन्यात |

| | | | |
|---|---|---|---|
| | ३.३) अहवालाच्या अनुषंगाने तात्पुरत्या नेमणूकीचे आदेशाबाबत | पोलीस यंत्रणेकडून चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल समाधानकारक असल्यास तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश निर्गमित करावेत.<br>पोलीस यंत्रणेकडून चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल असमाधानकारक असल्यास, सदर प्रकरण संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२६.८. २०१४ च्या शासन निर्णयाद्वारे गठीत चारित्र्य पडताळणी समिती समोर सादर करावे. समितीने तात्पुरती नेमणूक देण्याबाबत शिफारस केल्यास, संबंधित उमेदवारास तात्पुरती नेमणूकीचे आदेश निर्गमित करावेत. मात्र, समितीने अशी शिफारस न केल्यास तात्पुरती नेमणूकीचे आदेश निर्गमित न करता संबंधित उमेदवाराचे नाव गुणवत्ता / निवडयादीतून वगळण्याबाबत , आयोगास/ निवड समितीस पत्राद्वारे कळवून त्याची प्रत संबंधित उमेदवारांस चिन्हांकित करावी. | अहवाल प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ७ कार्यालयीन दिवसात |
| ४. | **ज्या पदांच्या सेवाप्रवेश नियमानुसार विवक्षित शारिरीक अर्हता आवश्यक असल्यास, अशा पदांवर नेमणूक आदेश निर्गमित करण्यापूर्वी वैद्यकीय तपासणी अहवाल आवश्यक आहे अशा प्रकरणात करावयाची कार्यवाही -** | | |
| | ४.१) समुचित वैद्यकीय प्राधिकाऱ्यांकडून वैद्यकीय तपासणी अहवाल मागवून घेण्यासाठी पत्र पाठविणे | ज्या पदांच्या सेवा प्रवेश नियमात विशिष्ट स्वरुपाच्या शारिरीक अर्हतेबाबतची तरतूद विवक्षितपणे नमूद करण्यात आली आहे अशा पदांच्या बाबतीत गुणवत्तायादी/ निवडयादी प्राप्त झाल्यानंतर संबंधित उमेदवारांची वैद्यकीय तपासणी अहवाल देण्याबाबत विनंती करणारे पत्र समुचित वैद्यकीय प्राधिकाऱ्यांस निर्गमित करावे. | शिफारस पत्र प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ७ कार्यालयीन दिवसात |
| | ४.२) वैद्यकीय तपासणी अहवाल प्राप्त करुन घेणे | संबंधित समुचित वैद्यकीय प्राधिकाऱ्यांस पत्र निर्गमित केल्यानंतर १ महिन्यात संबंधित यंत्रणेकडे पाठपुरावा करुन अहवाल प्राप्त करुन घेण्याची जबाबादारी संबंधित कार्यालयाची राहील. | पत्र निर्गमित केल्यापासून १ महिन्यात |
| | ४.३) अहवालाच्या अनुषंगाने तात्पुरत्या नेमणूकीचे आदेशाबाबत | वैद्यकीय तपासणी अहवालानुसार संबंधित उमेदवार शासकीय सेवा करण्यास पात्र+ असल्यास तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश निर्गमित करावेत.<br>वैद्यकीय तपासणीअंती संबंधित उमेदवार शासन सेवेसाठी अपात्र ठरल्यास, महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण अटी व शर्ती )१९८१ मधील नियम ११ नुसार तात्पुरती नेमणूकीचे आदेश निर्गमित न करता संबंधित उमेदवाराचे नाव गुणवत्ता / निवडयादीतून वगळण्याबाबत , आयोगास/ निवड समितीस पत्राद्वारे कळवून त्याची प्रत संबंधित उमेदवारांस चिन्हांकित करावी. | वैद्यकीय अहवाल प्राप्त झाल्यापासून ७ कार्यालयीन दिवसात |

| | | | |
|---|---|---|---|
| **टप्पा क्र.२:- प्राप्त शिफारसपत्रातील उमेदवारांचे चारित्र्य तपासणी अहवालाचे पत्र निर्गमित करणे.**<br>**(टप्पा क्र.१ व टप्पा क्र.२ अंतर्गतची कार्यवाही एकाच वेळी करणे आवश्यक आहे) ( टप्पा क्र.१ मधील अनुक्रमांक ३ येथील प्रकरणे वगळून इतर प्रकरणी टप्पा क्र.२ नुसार कार्यवाही करण्यात यावी.)** | | | |
| १. | संबंधित पोलीस यंत्रणेला चारित्र्य व पूर्वचारित्र्य यांचा अहवाल मागविण्यासाठी पत्र पाठवणे | शिफारसपत्रातील उमेदवारांचे चारित्र्य व पूर्व चारित्र्य यांची तपासणी ६ महिन्याच्या आत करणे आवश्यक असल्याने, नियुक्ती प्राधिकरी कार्यालयाने , संदर्भाधीन क्र.७ येथील दि.२८ ऑगस्ट २०१७ च्या शासन निर्णयानुसार गुणवत्ता यादी/ निवडयादी प्रापत झाल्यानंतर संबंधित पोलीस यंत्रणेला पत्र पाठवून चारित्र्य व पूर्वचारित्र्य यांचा अहवाल मागविणे | शिफारसपत्र प्राप्त झाल्यापासून ७ कार्यालयीन दिवसात |
| | | | |
| १. | टप्पा क्र.१ नुसार निर्गमित केलेल्या तात्पुरत्या नेमणूक आदेशापासून ३० दिवसात आवश्यक कागदपत्रांसह हजर होणाऱ्या उमेदवारांच्या कागदपत्रांची तपासणी करणे | तात्पुरत्या नेमणूकीच्या आदेशाच्या तारखेपासून ३० दिवसाच्या आत जे उमेदवार आयोगाला/ निवडसमितीला केलेल्या अर्जासोबत जोडलेली कागदपत्रे तसेच, अर्जातील दाव्याच्या तपासणीसाठी आवश्यक असणारी प्रमाणपत्रे या सर्व कागदपत्रांच्या मूळ प्रती व त्यांच्या छायांकित प्रतीसह कार्यालयात हजर होतील त्यावेळी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.<br>१) उमेदवाराने आयोगाला/ निवडसमितीला केलेल्या अर्जासोबत जोडलेली कागदपत्रे .तसेच, अर्जातील दाव्याच्या तपासणीसाठी आवश्यक असणारी प्रमाणपत्रे या सर्व कागदपत्रांच्या सत्य-असत्यतेबाबतची खातरजमा नियुक्ती प्राधिकारी कार्यालयातील राजपत्रित दर्जाच्या अधिकाऱ्यांनी करावी.<br>२) तसेच, संदर्भाधीन क्र.७ येथील दिनांक २८ऑगस्ट २०१७ च्या शासन निर्णयानुसार संबंधित उमेदवारांकडून साक्षांकन नमुना भरुन घेणे.<br>३) तसेच, उमेदवाराकडून शासन अधिसूचना दि. २८ मार्च २००५ नुसार छोटया कुटुंबाबाबतचे प्रमाणपत्र भरुन घ्यावे.<br>४) गट अ व गट ब च्या पदांना महसूल विभाग वाटप नियमावली लागू असल्यामुळे या गटामधील संवर्गात निवड झालेला उमेदवाराकडून महसूल विभागाचा विकल्प प्राप्त करुन घ्यावा. | उमेदवार आवश्यक कागदपत्रांसह हजर झाल्याच्या दिनांकास |
| २. | तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश निर्गमित करणे | नियुक्ती प्राधिकारी खालीलप्रमाणे खातरजमा करुन **परिशिष्ट दोन** येथील विहित नमुन्यात तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश निर्गमित करेल.<br>• उमेदवाराच्या आवश्यक कागदपत्रांच्या तपासणीअंती सत्यतेची खात्री पटली असेल व उमेदवाराने जातवैधता प्रमाणपत्र, मराठी व हिंदी | उमेदवार आवश्यक कागदपत्रांसह हजर झाल्याच्या दिनांकापासून दोन कार्यालयीन |

| | | | |
|---|---|---|---|
| | | भाषा उत्तीर्णची कागदपत्रे , संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण प्रमाणपत्र या तीन बाबींसंदर्भातील कागदपत्रांव्यतिरिक्त इतर सर्व कागदपत्रे सादर केली असल्यास<br>• टंकलेखन + समांतर आरक्षण<br>• संबंधिताने साक्षांकन नमुन्यात कोणताही गुन्हा नसल्याचे किंवा विभागीय चौकशी प्रलंबित नसल्याचे नमूद केले असल्यास,<br>• तसेच, छोटे कुटुंब प्रमाणपत्रात दोन पेक्षा जास्त अपत्य नसल्याचे नमूद केले असल्यास, | दिवसात |
| | | साक्षांकन नमुन्यात संबंधित उमेदवाराने त्याच्यावर गुन्हा दाखल केल्याचे नमूद केले असल्यास अथवा त्यांच्या पूर्वीच्या शासकीय सेवेत विभागीय चौकशीचे प्रकरण प्रलंबित असल्याचे नमूद केले असल्यास, सदर प्रकरण संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२६.८. २०१४ च्या शासन निर्णयाद्वारे गठीत चारित्र्य पडताळणी समिती समोर सादर करावे व समितीने नियुक्ती करण्याचा निर्णय दिल्यास त्या निर्णयानुसार संबंधित उमेदवारास तात्पुरती नियुक्ती देण्याची कार्यवाही करावी. | • समितीसमोर ८ दिवसात प्रकरण सादर करणे<br>• समितीच्या निर्णयानंतर दोन दिवसात तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश निर्गमित करणे |
| ३. | पदस्थापनेचे आदेश निर्गमित करणे | तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश निर्गमित केल्यानंतर, संबंधित उमेदवाराच्या पदस्थापनेसंदर्भात नियुक्ती प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने ३० दिवसात पदस्थापनेचे आदेश निर्गमित करावेत. | तात्पुरत्या नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसात |
| ४. | तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश रद्द करणे | उमेदवाराच्या आवश्यक कागदपत्रांच्या तपासणीअंती कागदपत्रे असत्य असल्याचे आढळून आल्यास, संबंधित उमेदवारास तात्पुरती नियुक्ती न देता त्याच्या तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश रद्द करुन, त्याप्रमाणे आयोगास/ निवडसमितीस कळविण्यात यावे व त्याची प्रत संबंधित उमेदवारास चिन्हांकित करण्यात यावी. | उमेदवार आवश्यक कागदपत्रांसह हजर झाल्याच्या दिनांकापासून दोन दिवसात |
| | | उमेदवाराने शासन अधिसूचना दि.. २८ मार्च २००५ नुसार छोटया कुटुंबाबाबतच्या भरुन दिलेल्या प्रमाणपत्रात नियुक्तीच्या वेळी दोन पेक्षा अधिक अपत्य असल्याचे नमूद केले असल्यास तात्पुरती नियुक्ती न देता त्याच्या तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश रद्द करुन, त्याप्रमाणे आयोगास/ निवडमंडळास कळविण्यात यावे. व त्याची प्रत संबंधित उमेदवारास चिन्हांकित करण्यात यावी. | |

| | | | |
|---|---|---|---|
| **टप्पा क्र.४- मुदतवाढ देणे** | | | |
| १. | उमेदवाराने रुजू होण्यासाठी मुदतवाढ देण्याचा अर्ज केल्यास, मुदतवाढीचे आदेश निर्गमित करणे | टप्पा क्र.१ नुसार तात्पुरत्या नेमणूक आदेशापासून ३० दिवसाच्या विहित मुदतीत उमेदवाराने रुजू होण्यासाठी मुदतवाढ मिळण्यासाठी समर्थनीय कारण व त्याबाबतची कागदपत्रे यासह अर्ज केल्यास,संदर्भ क्र. ७ येथील दि.२८ ते २०१८ च्या शासन निर्णयानुसार एक महिन्याची अथवा दि. २६ सप्टेंबर २०१८च्या शासन निर्णयानुसार अगोदरच शासन सेवेत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत दोन महिन्याची मुदत वाढ देण्यात येत असल्याबाबतचे आदेश सोबतच्या **परिशिष्ट ३ प्रमाणे** निर्गमित करावेत. | मुदतवाढीचा अर्ज प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ७ कार्यालयीन दिवसात |
| २. | उमेदवार वाढीव मुदतीत हजर झाल्यास कागदपत्र तपासणे, तात्पुरती नियुक्तीचे आदेश देणे अथवा तात्पुरती नेमणूक आदेश रद्द करणे | टप्पा क्र.३ प्रमाणे कार्यवाही करणे | टप्पा क्र.३ नुसार |
| **टप्पा क्र.५ - टप्पा क्र.३ व ४ मधील विहित मुदतीत हजर न होणाऱ्या उमेदवारांचे तात्पुरते नेमणूक आदेश रद्द करणे** | | | |
| १. | तात्पुरत्या नेमणूकीच्या आदेशापासून विहीत मुदतीत अथवा वाढीव मुदतीत उमेदवार हजर न झाल्यास नेमणूक आदेश आपोआप रद्द होणे. | **टप्पा क्र.३ व ४ मधील विहित मुदतीत हजर न होणाऱ्या उमेदवारांस** नियुक्तीमध्ये स्वारस्य नसल्याने त्यांचे तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश आपोआप रद्द होत असल्याने, केवळ तांत्रिक बाब म्हणून तात्पुरती नेमणूक रद्द करण्याचे आदेश निर्गमित करावेत. | विहीत मुदत संपल्यानंतर सात कार्यालयीन दिवसात |
| **टप्पा क्र.६ - तात्पुरत्या नियुक्ती आदेशानंतर करावयाची कार्यवाही** | | | |
| १. | उमेदवारांचा पूर्व चारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त करुन घेण्यासाठी पाठपुरावा करणे | टप्पा क्र.२ नुसार नवनियुक्त उमेदवारांच्या पूर्व चारित्र्य पडताळणी बाबत पोलीस अधिक्षक/ पोलीस आयुक्त यांच्याशी केलेल्या पत्रव्यवहारानुसार सदर अहवाल प्राप्त करुन घेण्यासाठी पाठपुरावा करणे व अहवाल १ महिन्यात प्राप्त करुन घेणे. | तात्पुरत्या नियुक्ती आदेशापासून १ महिना |
| २. | वैद्यकीय तपासणीसाठी संबंधित यंत्रणेला पत्रव्यवहार करणे | महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण अटी व शर्ती )१९८१ मधील नियम ११ मधील तरतूदीनुसार तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश निर्गमित केल्यानंतर ७ दिवसात संबंधित जिल्ह्यातील जिल्हा शल्य चिकित्सालय किंवा सक्षम आरोग्य अधिकारी यांच्याकडे नवनियुक्त उमेदवारांची वैद्यकीय तपासणी करुन त्यांना त्याबाबतचे प्रमाणपत्र १ महिन्यात देण्याबाबतचे पत्र निर्गमित करावे व त्याची प्रत उमेदवारास द्यावी. | तात्पुरत्या नियुक्ती आदेशापासून ७ कार्यालयीन दिवसात |
| ३. | उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र (नॉन क्रिमी लेअर प्रमाणपत्र) तपासण्यासाठी संबंधित यंत्रणेकडे पत्रव्यवहार करणे | शासन सेवेत उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याच्या प्रमाणपत्राच्या आधारे ज्या उमेदवारांना तात्पुरती नियुक्ती देण्यात आली आहे त्या उमेदवारांचे सदर प्रमाणपत्र संदर्भाधीन क्र येथील महिला व बाल विकास विभागाच्या दि.२५ मे, २००१ च्या शासन | तात्पुरत्या नियुक्ती आदेशापासून ७ कार्यालयीन दिवसात |

| | | | |
|---|---|---|---|
| | | निर्णयात नमूद केलेल्या शासकीय यंत्रणेकडून तपासून घेण्यासाठी पत्र निर्गमित करुन १ महिन्यात अहवाल देण्याबाबत विनंती करण्यात यावी तसेच सदर अहवाल मिळण्यासाठी पाठपुरावा करण्यात यावा. | |
| ४. | जातवैधता प्रमाणपत्र तपासण्यासाठी जात पडताळणी समितीकडे पत्रव्यवहार करणे | शासन सेवेत आरक्षित पदावर निवड झालेल्या उमेदवारांनी जातवैधता प्रमाणापत्र सादर केले नसल्यास, जात प्रमाणपत्र शासनाच्या जात पडताळणी समितीकडून तपासून घेण्यासाठी पत्र निर्गमित करुन १ महिन्यात अहवाल देण्याबाबत विनंती करण्यात यावी. सदर पत्राची प्रत संबंधित उमेदवारास चिन्हांकित करावी. तसेच , जात पडताळणी अधिनियम २००१ च्या कलम ८ नुसार जात सिध्द करण्याची /जातवैधता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची असल्याने , सदर उमेदवारांनी विहित मुदतीमध्ये त्यांचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यास, जातपडताळणी अधिनियम २००१ च्या कलम १० अनुसार त्यांची सेवा समाप्त करण्याची कार्यवाही करण्यात येईल असे सदर पत्रात स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. | तात्पुरत्या नियुक्ती आदेशापासून ७ कार्यालयीन दिवसात |
| **<u>टप्पा क्र.७</u> - टप्पा क्र.६ नुसार कार्यवाही केल्यानंतर त्याअनुषंगाने प्राप्त होणारे अहवाल असमाधानकारक असल्यास तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश रद्द करणे .** | | | |
| १. | उमेदवाराच्या पूर्व चारित्र्य पडताळणी अहवाल सदोष असल्यास /असमाधानकारक असल्यास करावयाची कार्यवाही | नवनियुक्त उमेदवारांच्या पूर्व चारित्र्य पडताळणी बाबत पोलीस अधिक्षक/ पोलीस आयुक्त यांच्याकडील अहवाल सदोष असल्यास/ असमाधानकारक असल्यास, संबंधित उमेदवाराची तात्पुरती नियुक्ती पुढे चालू ठेवावी किंवा समाप्त करावी यासंदर्भात संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२६.८.२०१४ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार कार्यवाही करण्यात यावी. | अहवाल प्राप्त झाल्यापासून ८ दिवसात दि.२६.८.२०१४ च्या शा.नि.नुसार कार्यवाही करावी. |
| २. | वैद्यकीय तपासणी अहवालानुसार अपात्र ठरत असल्यास तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश रद्द करणे. | वैद्यकीय तपासणीअंती संबंधित उमेदवार शासन सेवेसाठी अपात्र असल्याचे सिध्द झाल्यास, महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण अटी व शर्ती )१९८१ मधील नियम ११ मध्ये नमूद कार्यपध्दतीनुसार तात्पुरती नियुक्तीचे आदेश रद्द करुन, त्याप्रमाणे आयोगास/ निवडमंडळास कळविण्यात यावे व त्याची प्रत संबंधित उमेदवारास चिन्हांकीत करावी. | अहवाल प्राप्त झाल्यानंतर विहित कार्यपध्दती अवलंबून तात्काळ |
| ३. | उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र (नॉन क्रिमी लेअर प्रमाणपत्र) तपासण्यासाठी संबंधित यंत्रणेकडे पत्रव्यवहार करणे | सदर प्रमाण पत्र अवैध ठरल्यास, महिला व बाल विकास विभाग, आदिवासी विकास विभाग, सामाजिक न्याय विभाग, अथवा विमुक्त् जाती , भटक्या जमाती , इतर मागास प्रवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन | अहवाल प्राप्त झाल्यानंतर विहित कार्यपध्दती अवलंबून |

| | | | |
|---|---|---|---|
| | | निर्णयानुसार तात्पुरती नियुक्ती रद्दबादल ठरविण्याबाबत कार्यवाही करावी. | तात्काळ |
| ४. | जात प्रमाणपत्र अवैध असल्याचा अहवाल संबंधित यंत्रणेकडून प्राप्त झाल्यास | १) संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१२.१२.२०११ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार जात पडताळणी समितीने उमेदवाराचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविले असल्यास, त्याचे तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश त्वरीत रद्द करावेत.<br>२) तसेच, त्या उमेदवाराविरुद नियुक्ती प्राधिकारी कार्यालयाने , महाराष्ट्र अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग अधिनियम २००० मधील तरतूदीनुसार त्वरीत कार्यवाही करावी. | अहवाल प्राप्त झाल्यानंतर विहित कार्यपध्दती अवलंबून तात्काळ |
| **टप्पा क्र.८ - नियमित नियुक्ती आदेश निर्गमित करणे** | | | |
| १. | नियमित नियुक्ती आदेश निर्गमित करणे | तात्पुरती नियुक्ती दिल्यानंतर संबंधित उमेदवाराने सदर पदावर अखंडपणे ३ वर्ष सेवा केल्यानंतर संदर्भाधीन क्र.----- दिनांक ११ सप्टेंबर २०१४ चा शासन निर्णय व संदर्भाधीन क्र.-----दि१९ सप्टेंबर,२०१७ चे शासन परिपत्रकानुसार त्याला स्थायित्व लाभ प्रमाणपत्र देण्याबाबतचे आदेश निर्गमित करताना, सदर आदेशाद्वारेच त्याची तात्पुरती नियुक्ती नियमित करण्यात येत असल्याचे स्पष्टपणे नमूद करण्यात यावे.<br>सबब, तात्पुरती नियुक्ती नियमित करण्यासाठी स्थायित्व लाभ प्रमाणपत्राच्या सर्व अटी शर्तीची तसेच, नियुक्ती आदेशात नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तीची पूर्तता करणे आवश्यक राहील. | तात्पुरत्या नियुक्ती आदेशापासून ३ वर्षाची अखंड सेवा झाल्यानंतर तात्काळ |
| **टप्पा क्र.९ - उमेदवाराने खोटया कागदपत्रांच्या आधारे शासकीय नोकरी मिळविल्याचे सिध्द झाल्यास संबंधिताची शासकीय सेवा समाप्त करणे** | | | |
| १. | उमेदवाराने खोटया कागदपत्रांच्या आधारे शासकीय नोकरी मिळविल्याचे सिध्द झाल्यास संबंधिताची शासकीय सेवा समाप्त करण्याबाबत | संबंधित उमेदवार हा सेवा प्रवेश नियमानुसार सेवेस पात्र नसल्याचे किंवा मूळ नियुक्तीसाठी खोटी कागदपत्रे किंवा खोटी प्रमाणपत्रे या आधारे शासन सेवेत रुजू झाल्याचे शासकीय सेवेत कोणत्याही वेळी सिध्द झाल्यास, त्याला चौकशी न करता सेवेतून काढून टाकण्याची /सेवा समाप्तीची कार्यवाही करण्यात यावी. ( संदर्भाधीन क्र.------ सा.प्र.वि. शासन निर्णय दि.१२.१०.१९९३ नुसार) | |

**ब) प्रतिक्षायादीनुसार नियुक्तीबाबतची कार्यपध्दती व वेळापत्रक:-**

उपरोक्त (अ) येथील तक्त्यामधील टप्पा क्र.५ नुसार मूळ गुणवत्ता यादीतील उमेदवाराचे नेमणूकीचे आदेश रद्द झाल्यास अथवा संबंधित उमेदवार रुजू झाल्यानंतर प्रतिक्षासूचीचा वैधता कालावधी संपण्यापूर्वी राजीनामा दिल्यास किंवा त्याचा मृत्यू झाल्यास अथवा शासनाने प्रतिक्षासूचीचा वैधता कालावधी संपण्यापूर्वी त्याच्या तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश रद्द केल्यास या कारणास्तव रिक्त होणाऱ्या पदांवरच प्रतिक्षायादीतील उमेदवाराची नेमणूक करता येईल. अशा प्रकारे मूळ

गुणवत्तायादीतील जेवढया उमेदवारांची पदे रिक्त होतील एवढयाच उमेदवारांची प्रवर्ग निहाय प्रतिक्षायादीमधून मागणी करता येऊ शकेल. तसेच, भविष्यात रिक्त होणाऱ्या पदांवर प्रतिक्षायादीतून उमेदवारांची नेमणूक करता येणार नाही.

प्रतिक्षायादीमधून उमेदवारांच्या नियुक्तीची कार्यवाही पुढीलप्रमाणे करण्यात यावी.

| अ.क्र. | नियुक्ती प्रक्रियेचे टप्पे | नियुक्तीच्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही | वेळापत्रक |
|---|---|---|---|
| **टप्पा क्र.१-प्रतिक्षायादीतील उमेदवारांची मागणी करणे** | | | |
| | प्रतिक्षायादीतील उमेदवारांची मागणी करण्यासाठी पत्रव्यवहार करणे | संदर्भाधीन क्र.------दिनांक ऑगस्ट २०१९ च्या शासन परिपत्रक तसेच संदर्भाधीन क्र.---- दिनांक १३ जून २०१८ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार ज्या पदभरतीसाठी प्रतिक्षायादी ठेवण्यात येते त्याप्रकरणी सदर प्रतिक्षायादीचा वैधता कालावधी समाप्त होण्यापूर्वी, उपरोक्त (अ) येथील तक्त्यातील टप्पा क्र.५ नुसार विहित मुदतीत हजर न होणाऱ्या उमेदवारांचे तात्पुरते नेमणूक आदेश रद्द केल्यानंतर आयोग/ निवडसमितीकडे प्रतिक्षायादीतील उमेदवारांची नावे १ महिन्यात कळविण्याबाबत पत्रव्यवहार करावा. | मूळ गुणवत्ता यादी/ निवड यादीतील उमेदवारांचे तात्पुरते नेमणूक आदेश रद्द केल्यानंतर १५ ि दिवसाच्या आत |
| | प्रतिक्षायादी प्राप्त करुन घेणे | एक महिन्याच्या कालावधीत प्रतिक्षायादी प्राप्त होण्यासाठी आयोग/निवडसमितीकडे पाठपुरावा करुन यादी प्राप्त करुन घेण्याची दक्षता घ्यावी. | १ महिन्यात |
| **टप्पा क्र.२-प्रतिक्षा यादीतील उमेदवारांना नियुक्ती देणे** | | | |
| | प्रतिक्षा यादीतील उमेदवारांना नियुक्ती देणे | उपरोक्त (अ) मध्ये नमूद कार्यपध्दतीनुसार व वेळापत्रकानुसार नियुक्तीची कार्यवाही करावी | |

(क) **आदेश निर्गमित करण्याचे अधिकार-**

| **गट** | **तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश** | **मुदतवाढीचे आदेश** | **तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश** | **नियमित नियुक्तीचे आदेश** | **पदस्थापनेचे आदेश तसेच सेवा समाप्तीचे आदेश** |
|---|---|---|---|---|---|
| अ व ब | प्रशासकीय विभागाचे सचिव/प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव | | | | नियुक्ती प्राधिकारी |
| ब(अराजपत्रित), क व ड | नियुक्ती प्राधिकारी अथवा नियुक्ती प्राधिकारी यांनी सदर आदेश निर्गमित करण्याचे अधिकार नजिकच्या निम्न अधिका-यास विशेष आदेशाद्वारे प्रदान केले आहेत असा अधिकारी | | | | नियुक्ती प्राधिकारी |

**टीप :-** गट निहाय नियुक्ती प्राधिकारी हे साप्रवि शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०१६/ प्र.क्र.२९०/ कार्या-१२ दिनांक १९.११.२०१६ च्या आदेशान्वये निश्चित करण्यात आले आहेत.

(ड) संदर्भाधीन शासन निर्णयातील आदेश ज्या शासकीय यंत्रणेने निर्गमित केले आहेत त्यांचे संकलन करुन या शासन निर्णयाद्वारे मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या असल्यामुळे, संबंधित आदेशामध्ये भविष्यात त्या त्या यंत्रणेद्वारे वेळोवेळी जे बदल करण्यात येतील ते बदल विचारात घेऊन त्याप्रमाणे उपरोक्त (अ) येथील तक्त्यातील रकाना क्र.३ येथील नियुक्तीबाबतची कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

-----------------

**उपरोक्त प्रारुप शासन निर्णयाबाबतचे आपले अभिप्राय या विभागास दि.९ ऑगस्ट २०२० पर्यंत द्यावेत , ही विनंती.**

## परिशिष्ट - १
## तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश

तात्पुरत्या नेमणूकीच्या आदेशात खालील बाबींचा स्पष्टपणे उल्लेख करण्यात यावा.

१) ज्या प्रकरणी टप्पा क्र.१ .१ नुसार शिफारस पत्र हे समन्वय कार्यालयाकडे प्राप्त होते अशा प्रकरणी, तात्पुरत्या नेमणुकीच्या आदेशामध्ये, उमेदवारांनी सोबत जोडलेल्या परिशिष्टानुसार त्यांना वाटप करण्यात आलेल्या कार्यालयामध्ये सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत रुजू होण्याबाबतचा उल्लेख करणे आवश्यक राहील व सदर आदेशाची प्रत संबंधित कार्यालयांना पृष्ठांकित करणे आवश्यक राहील.

**किंवा**

१) ज्या प्रकरणी टप्पा क्र.१ .२ नुसार शिफारस पत्र हे थेट नियुक्ती प्राधिकारी कार्यालयास प्राप्त होते अशा प्रकरणी, तात्पुरत्या नेमणुकीच्या आदेशामध्ये, उमेदवारांनी सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत नियुक्ती प्राधिकारी कार्यालयात रुजू होण्याबाबतचा उल्लेख करणे आवश्यक राहील .

२) ३० दिवसात रुजू होताना, संबंधित उमेदवाराने ------ पदाच्या जाहिरात क्र.----- दि.------- मध्ये नमूद केल्यानुसार खालील सर्व मूळ कागदपत्रे व त्यांच्या छायांकित प्रती सह उपस्थित राहावे याबाबतचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

- वयाच्या पुराव्यासंबंधी कागदपत्रे
- शैक्षणिक अर्हते बाबतची कागदपत्रे
- शैक्षणिक अर्हते व्यतिरिक्त इतर तांत्रिक अर्हता (जाहिरातीत नमूद केले असल्यास) त्याबाबतची कागदपत्रे
- अनुभवाची अट (जाहिरातीत नमूद केले असल्यास) त्याबाबतची आवश्यक ती कागदपत्रे
- अधिवास प्रमाणपत्र (जाहिरातीत नमूद केले असल्यास),
- राष्ट्रीयत्व प्रमाणपत्र (जाहिरातीत नमूद केले असल्यास),
- शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या धोरणानुसार उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याबाबतचे प्रमाणपत्र (Non Creamy Layer Certificate) (ज्या प्रवर्गासाठी आवश्यक आहे त्या प्रवर्गासाठी )
- जाहिरातीमध्ये सदर पद **सामाजिक आरक्षणानुसार** ज्या ज्या मागासप्रवर्गासाठी राखीव असल्याचे नमूद केले आहे, त्या त्या जातप्रवर्गातून निवड झालेल्या उमेदवारांचे ते संबंधित जात प्रवर्गाचे प्रमाणपत्र तसेच, संबंधित जातीचे वैधता प्रमाणपत्र
- जाहिरातीमध्ये सदर पद **समांतर आरक्षणानुसार** ज्या ज्या घटकांसाठी आरक्षित केल्याचे नमूद केले आहे,(उदा. खेळाडू, दिव्यांग, माजी सैनिक, प्रकल्पग्रस्त, महिला आरक्षण, अनाथ आरक्षण इ. ) त्या त्या घटकातून निवड झालेल्या उमेदवारांने ते संबंधित घटकात मोडत असल्याबाबतचे आवश्यक प्रमाणपत्र तसेच, समांतर आरक्षणाच्या अनुषंगाने आवश्यक असणारी इतर प्रमाणपत्रे.
- संगणक ज्ञान अर्हता परीक्षा (MS-CIT ) उत्तीर्ण केल्याबाबतचे प्रमाणपत्र
- मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण झाल्याबाबतची कागदपत्रे
- या व्यतिरिक्त महाराष्ट्र लोकसेवा आयोग/ निवड समिती यांच्या जाहिरातीनुसार अर्ज करताना उमेदवारांनी सादर केलेली सर्व कागदपत्रे

३) उमेदवारास ३० दिवसाच्या विहित मुदतीत हजर होणे शक्य नसल्यास, त्याने सदर ३० दिवसाच्या विहित मुदतीमध्येच त्याबाबतची सविस्तर कारणमीमांसा व कागदपत्राच्या पुष्टीसह मुदतवाढीचा अर्ज ------ या कार्यालयास सादर करणे आवश्यक असेल. असा स्पष्ट उल्लेख आदेशात करण्यात यावा.

४) ३० दिवसाच्या विहित मुदतीत उमेदवार हजर न झाल्यास अथवा हजर होण्यासाठी मुदतवाढ देण्याचा अर्ज सादर न केल्यास, त्यांना शासकीय सेवेत स्वारस्य नाही असे समजून त्यांचे तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश आपोआप रद्द होतील असा स्पष्ट उल्लेख आदेशात करण्यात यावा.

५) तसेच, ३० दिवसाच्या विहित मुदतीत उमेदवार हजर न झाल्यास अथवा हजर होण्यासाठी मुदतवाढ देण्याचा अर्ज सादर न केल्यास, तदनंतर उमेदवाराकडून प्राप्त होणाऱ्या कोणत्याही अर्जाचा विचार करण्यात येणार नाही, असा स्पष्ट उल्लेख आदेशात करण्यात यावा.

६) ज्या पदांच्या सेवाप्रवेश नियमामध्ये नियुक्तीपूर्वीच विवक्षित शारिरीक अर्हता तपासणे आवश्यक असल्याचे नमूद केले आहे, त्या पदांकरिता निवड झालेल्या उमेदवारास नियुक्ती आदेश देण्यापूर्वी , वैद्यकीय तपासणी करण्यात येत असल्याने, अशा प्रकरणी वैद्यकीय अहवाल समाधानकारक असल्यास, तसा स्पष्ट उल्लेख तात्पुरत्या नेमणूकीच्या आदेशात करण्यात यावा.

७) ज्या संवेदनशील पदांच्या अनुषंगाने नेमणूक आदेश देण्यापूर्वी चारित्र्य पडताळणी अहवाल आवश्यक आहे अशा प्रकरणी चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणी अहवाल समाधानकारक असल्यास, तसा स्पष्ट उल्लेख तात्पुरत्या नेमणूकीच्या आदेशात करण्यात यावा.

८) **महसूली संवर्ग वाटप नियमावली** ही गट अ व गट ब (राजपत्रित व अराजपत्रित) च्या पदांना लागू असल्याने , या गटामधील उमेदवारांना तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश निर्गमित करताना , सदर आदेशासोबत महसूल विभाग वाटप नियमावलीनुसार संबंधित पदासाठी महसूली विभाग निहाय मंजूर पदे व रिक्त पदे याबाबतचा तपशील देण्यात यावा व उमेदवारांस ३० दिवसाच्या मुदतीत कार्यालयात हजर होताना त्यावेळी महसूली विभागाचा विकल्प सादर करण्याबाबत सूचित करण्यात यावे.

९) **तात्पुरती नेमणूक ही न्यायालयीन प्रकरणाच्या अधीन राहून देण्यात येत असल्यास,** तसा स्पष्ट उल्लेख तात्पुरत्या नेमणूकीच्या आदेशात करण्यात यावा.

*****

## परिशिष्ट - २
## तात्पुरत्या नियुक्ती आदेश

**तात्पुरत्या नियुक्तीच्या आदेशात खालील बाबींचा स्पष्टपणे उल्लेख करण्यात यावा.**

i. संबधित उमेदवारास ----------या पदावर ------------या वेतनश्रेणीत दिनांक ----------पासून (उमेदवार ज्या दिनांकास परिपूर्ण कागदपत्रासह हजर होईल तो दिनांक ) तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

ii. संबंधित उमेदवारास ----------------या ठिकाणी पदस्थापना देण्यात येत आहे/ उमेदवाराच्या पदस्थापनेचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील. पदस्थापना देण्याकरिता उमेदवाराने कोणत्याही राजकीय पक्ष किंवा लोकप्रतिनिधींचा दबाव आणल्यास त्यांच्या तात्पुरत्या नियुक्तीचे आदेश रद्द करण्यात येतील.

iii. संबंधित पदासाठी ------------ वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी असेल व सदर कालावधीत उमेदवाराने खालील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील, असा आदेशात स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. ( संबंधित पदास परिविक्षाधीन कालावधी असल्यास)
   - विभागीय परीक्षा / व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण होणे
   - प्रशिक्षण पूर्ण करणे
   - कार्यमुल्यमापन अहवाल चांगले व प्रतवारी किमान ब" अथवा एकूण १० संख्यात्मक गुण पैकी किमान ४ गुण असणे आवश्यक राहील.
   - मुल्यांकन अहवाल समाधानकारक असणे आवश्यक आहे.

iv. परिविक्षाधीन कालावधीमध्ये कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहित विभागीय परीक्षा परिविक्षाधीन कालावधीमध्ये उत्तीर्ण न केल्यास अथवा इतर अटींची पूर्तता न केल्यास आणि अशा तऱ्हेने त्यांचे काम योग्य अथवा अनुरुप न आढळल्यास ते सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील असा आदेशात स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. ( संबंधित पदास परिविक्षाधीन कालावधी असल्यास)

v. संबंधित पदासाठी ------------ ही व्यावसायिक परीक्षा असेल (व्यावसायिक परीक्षा असल्यास). सदर परीक्षा ----------- कालावधीत व --------इतक्या संधीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच, विहित कालावधीत व विहीत संधीत सदर परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास -------------हे परिणाम (संबंधित परीक्षा नियमात नमूद केलेले परिणाम ) होतील . या सर्व बाबींचा आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

vi. संबंधित पदासाठी ------------ ही विभागीय परीक्षा असेल (विभागीय परीक्षा असल्यास) सदर परीक्षा ----------- कालावधीत व --------इतक्या संधीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच, विहित कालावधीत व विहीत संधीत सदर परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास -------------हे परिणाम (उदा. वेतनवाढ रोखणे, ज्येष्ठता बाधीत होणे इ. संबंधित विभागीय परीक्षा नियमात नमूद केलेले परिणाम ) होतील . या सर्व बाबींचा आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

vii. उमेदवाराने हजर होताना , जातवैधता प्रमाणपत्र सादर केलेले आहे. / नाही.
   - उमेदवाराने हजर होताना , जातवैधता प्रमाणपत्र सादर केलेले असल्यास, त्याबाबतचा उल्लेख जातवैधता प्रमाणपत्राचा क्रमांक व दिनांकासह नियुक्ती आदेशामध्ये स्पष्ट करण्यात यावा.

- उमेदवाराने जातवैधता प्रमाणपत्र सादर केले नसल्यास, सदर प्रमाणपत्र सहा महिन्याच्या आत (अथवा शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार) सादर करण्याच्या अधीन राहून सदर तात्पुरती नियुक्ती देण्यात येत असल्याचा आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. तसेच, संबंधित मागास वर्गीय उमेदवाराने विहित मुदतीत त्याचे जातवैधता प्रमाणपत्र सादर न केल्यास, त्याच्यावर जात पडताळणी अधिनियम २००१ च्या कलम १० नुसार सेवा समाप्तीची कार्यवाही करण्यात येईल असे आदेशामध्ये स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. त्याचप्रमाणे जातप्रमाणपत्र अवैध ठरल्यास सेवा समाप्तीची कार्यवाही करण्यात येईल असे आदेशामध्ये स्पष्टपणे नमूद करण्यात यावे.

viii. उमेदवाराने हजर होताना , संगणक अर्हता प्रमाणपत्र सादर केलेले आहे. / नाही.

- उमेदवाराने हजर होताना , संगणक अर्हता प्रमाणपत्र सादर केलेले असल्यास, त्याबाबतचा उल्लेख संगणक अर्हता प्रमाणपत्राचा क्रमांक व दिनांकासह नियुक्ती आदेशामध्ये स्पष्ट करण्यात यावा.
- उमेदवाराने संगणक परीक्षा उत्तीर्ण प्रमाणपत्र केले नसल्यास , सदर प्रमाणपत्र तात्पुरत्या नियुक्ती आदेशापासून दोन वर्षाच्या आत (अथवा शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार) सादर करण्याच्या अधीन राहून सदर तात्पुरती नियुक्ती देण्यात येत असल्याचा आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. सदर विहित मुदतीत सादर न केल्यास वेतनवाढ रोखण्यात येईल तसेच वरिष्ठ पदावर पदोन्नती देण्यात येणार नाही याबाबतचा देखील आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

ix. उमेदवाराने हजर होताना मराठी व हिंदी भाषा उत्तीर्ण केल्याबाबतची कागदपत्रे सादर केली आहेत/नाही.

- उमेदवाराने हजर होताना मराठी व हिंदी भाषा उत्तीर्ण केल्याबाबतची कागदपत्रे सादर केली असल्यास, संबंधित उमेदवारास मराठी व हिंदी भाषा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे याबाबतचा स्पष्ट उल्लेख आदेशात करण्यात यावा.
- उमेदवाराने हजर होताना मराठी व हिंदी भाषा उत्तीर्ण केल्याबाबतची कागदपत्रे सादर केली नसल्यास, सदर परीक्षा चार/तीन वर्षाच्या विहित मुदतीत (अथवा शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार) उत्तीर्ण करण्याच्या अधीन राहून नियुक्ती देण्यात येत असल्याचा आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. सदर विहित कालावधीत हिंदी व मराठी भाषा उत्तीर्ण न केल्यास वेतनवाढ रोखण्यात येईल तसेच वरिष्ठ पदावर पदोन्नती देण्यात येणार नाही याबाबतचा देखील आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

x. उमेदवाराने हजर होताना वैद्यकीय तपासणी अहवाल प्राप्त झाला आहे/नाही.

- उमेदवाराने हजर होताना वैद्यकीय तपासणी अहवाल प्राप्त झाला असून त्यानुसार तो शासकीय सेवा करण्यास सक्षम असल्यास तसा उल्लेख आदेशामध्ये स्पष्टपणे करण्यात यावा. ( ज्या पदांसाठी नियुक्तीपूर्वी वैद्यकीय तपासणी अनिवार्य आहे अशा पदांसाठी )
- उमेदवाराने हजर होताना, त्यांचा वैद्यकीय तपासणी अहवाल प्राप्त झाला नसल्यास, संबंधित उमेदवाराची तात्पुरती नियुक्ती ही सहा महिन्याच्या आत वैद्यकीय तपासणी करण्याच्या अधीन राहून करण्यात येत असल्याचा आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. तसेच, भविष्यात प्राप्त होणाऱ्या वैद्यकीय तपासणी अहवालानुसार उमेदवार शासकीय सेवा करण्यास अपात्र असल्याचे सिध्द झाल्यास, संबंधिताची सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल.

असा आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा( ज्या पदांसाठी नियुक्तीपूर्वी वैद्यकीय तपासणी अनिवार्य नाही अशा पदांसाठी )

xi. उमेदवाराने हजर होताना, त्यांचा चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त झाला आहे/नाही.

- उमेदवाराने हजर होताना, त्यांचा चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त झाला असून तो समाधानकारक असल्यास, तसा उल्लेख आदेशामध्ये स्पष्टपणे करण्यात यावा. ( ज्या संवेदनशील पदांसाठी नियुक्तीपूर्वी चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अनिवार्य आहे अशा पदांसाठी )
- उमेदवाराने हजर होताना, त्यांचा चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त झाला नसल्यास, संबंधित उमेदवाराची तात्पुरती नियुक्ती ही सहा महिन्याच्या आत चारित्र्य व पूर्वचारित्र्य याची पडताळणी करण्याच्या अधीन राहून करण्यात येत आहे, असा आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. त्याचप्रमाणे भविष्यात प्राप्त होणारा चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल असमाधानकारक/ सदोष असल्यास, संबंधिताची सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल. असा आदेशामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यात यावा. ( ज्या संवेदनशील पदांसाठी नियुक्तीपूर्वी चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अनिवार्य नाही अशा पदांसाठी)

xii. नवीन उमेदवारांना नविन परिभाषिक अंशदान निवृत्ती वेतन लागू होईल याबाबतचा उल्लेख करण्यात यावा.

xiii. या व्यतिरिक्त संबंधित पदाच्या सेवा प्रवेश नियमातील तरतूदीनुसार आवश्यक त्या सूचनांचा आदेशात स्पष्ट उल्लेख करावा.

xiv. या व्यतिरिक्त सेवाविषयक बाबी संदर्भात सामान्य प्रशासन विभाग, वित्त विभाग तसेच अन्य विभागांनी वेळीवेळी निर्गमित केलेल्या आवश्यक त्या सूचनांचा नियुक्ती आदेशात स्पष्ट उल्लेख करावा.

xv. शासकीय सेवेच्या कालावधीत संबंधित उमेदवार हा सेवा प्रवेश नियमानुसार सेवेस पात्र नसल्याचे किंवा मूळ नियुक्तीसाठी खोटी कागदपत्रे किंवा खोटी प्रमाणपत्रे या आधारे शासन सेवेत रुजू झाल्याचे सिध्द झाल्यास, त्याला चौकशी न करता सेवा समाप्तीची कार्यवाही करण्यात येईल असा उल्लेख आदेशात करण्यात यावा.

xvi. संबंधित उमेदवारांना महाराष्ट्र नागरी सेवेबाबतचे सर्व नियम पुस्तिकेतील नियम लागू राहतील.असा उल्लेख आदेशात करण्यात यावा.

xvii. यापूर्वी शासन सेवेत असणाऱ्या उमेदवारास नव्याने शासकीय सेवेत नियुक्ती देण्यात येत असल्यास, अशा उमेदवारांच्या तात्पुरत्या नियुक्ती आदेशात खालील बाबींचा उल्लेख करण्यात यावा.

- पूर्वीच्या शासकीय सेवेच्या पदाचा धारणाधिकार संबंधित उमेदवारांने संपादीत केला असेल तरच संबंधित उमेदवार नवीन नियुक्ती सोडून पूर्वीच्या शासकीय सेवेत जाण्यास पात्र असेल.
- पूर्वीच्या शासकीय सेवेत संबंधित उमेदवाराच्या विरुध्द कोणतीही विभागीय चौकशी सुरु असल्यामुळे चारित्र्य पडताळणी संदर्भात निर्णय घेण्यासाठी गठीत केलेल्या समितीच्या निर्णयानुसार नव्याने शासकीय सेवेत नियुक्ती देण्यात येत असल्यास, अशा प्रकरणी पूर्वीच्या शासकीय सेवेतील विभागीय चौकशी अंती बडतर्फीची शिक्षा झाली असेल तर सदर पदावरील शासन सेवेतील नियुक्ती रद्द करण्यात येईल.
- पूर्वीच्या शासन सेवेतील पदाच्या ज्येष्ठतेचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.
- पूर्वीच्या पदावर परिविक्षाधीन कालावधी पूर्ण केला असला तरीही या पदास परिविक्षाधीन कालावधी असल्यास, तो नव्याने पूर्ण करणे आवश्यक राहील.

*****

## परिशिष्ट - ३

## मुदतवाढीचे आदेश

नेमणूकीच्या आदेशापासून विहित एक महिन्याच्या कालावधीत रुजू होणे शक्य नसल्याने, सदर एक महिन्याच्या कालावधीतच मुदतवाढी बाबत अर्ज सादर केला असल्यास त्यानुसार मुदतवाढ देण्याबाबतचे आदेश निर्गमित करताना सदर आदेशात खालील बाबींचा स्पष्ट पणे उल्लेख करण्यात यावा.

१) आपल्या क्र.------- दि.-------- च्या मुदतवाढ मिळण्याच्या अर्जानुसार आपणास ------- या पदावर हजर होण्यासाठी सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाची मुदतवाढ देण्यात येत आहे.

२) सदर वाढीव मुदतीत आपण हजर न झाल्यास, आपणास शासकीय सेवेत स्वारस्य नाही असे समजून आपले तात्पुरत्या नेमणूकीचे आदेश आपोआप रद्द होतील असा स्पष्ट उल्लेख आदेशात करण्यात यावा.

*****

## परिशिष्ट - ४

## प्रतिक्षायादीतील उमेदवारांच्या तात्पुरत्या नियुक्ती आदेश

या शासन निर्णयाच्या परिशिष्ट २ मध्ये उल्लेख केलेल्या सर्व अटी व शर्ती प्रतिक्षायादीतील उमेदवारांच्या तात्पुरत्या नियुक्ती आदेशात नमूद करण्यात याव्यात. तसेच, प्रतिक्षासूचीतील उमेदवारांची ज्येष्ठता, प्रतिक्षायादीतील क्रमानुसार व त्यांच्या सेवेत रुजू होण्याच्या दिनांकानुसार निश्चित करण्यात येईल. आणि त्यांना मूळ गुणवत्ता यादीनुसार ज्येष्ठतेचे लाभ अनुज्ञेय राहणार नाही, असा स्पष्ट उल्लेख त्यांच्या नियुक्ती आदेशात करावा.

*****